**निम्न वर्धा प्रकल्प, ता.आर्वी, जि.वर्धा या प्रकल्पाच्या रु.३६१५.२९ कोटी इतक्या किंमतीस चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करणे.**

**महाराष्ट्र शासन**
**जलसंपदा विभाग**
**शासन निर्णय क्र. सुप्रमा २०१८/प्र.क्र. १५५/मोप्र-२**
मंत्रालय, मुंबई-४०००३२.
दिनांक : २३ ऑगस्ट २०१८.

**पहावे :-** १. शासन निर्णय क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आ) दिनांक ९ सप्टेंबर, २०१५.
२. शासन शुद्धिपत्रक क्र. संकीर्ण-२०१५/(३५/२०१५)/जसं(आस्था) दिनांक २२ जून, २०१६.
३. विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर यांचे पत्र जा.क्र.९९६५/ विपाविम /कातां- २/ २०१७, दि. ३१/१०/२०१७.

**प्रस्तावना :-**

निम्न वर्धा प्रकल्प हा धनोडी ता. आर्वी जि. वर्धा येथे वर्धा नदीवर धरण तसेच पुलगाव व खर्डा बॅरेज अंतर्भूत असलेला प्रकल्प आहे. या प्रकल्पास सन २००६-०७ पासून केंद्रशासनाच्या वेगवर्धित सिंचन लाभ कार्यक्रमांतर्गत अर्थसहाय्य प्राप्त होत आहे. सदर प्रकल्पाचे लाभक्षेत्र विदर्भातील वर्धा जिल्हयातील शेतकरी आत्महत्या ग्रस्त आर्वी, देवळी, वर्धा व हिंगणघाट तालुक्यातील आहे. या प्रकल्पाचा लाभ कृषी, सिंचनासह पिण्यासाठी पाणीपुरवठा, औद्योगिक पाणीवापर , मत्स्य व्यवसाय यासाठी होणार आहे.

प्रकल्पाचा समावेश नोव्हेंबर २०१५ मध्ये प्रधानमंत्री कृषी सिंचाई योजनेत (P.M.K.S.Y.) झाला असून प्रकल्पास केंद्र शासनाचे अर्थसहाय्य प्राप्त होत आहे. सदर योजनेच्या निर्धारीत कार्यक्रमानुसार हा प्रकल्प तृतीय प्राधान्याने पूर्ण करावयाचा असून प्रकल्पीय कामे मार्च २०१९ अखेर व लाभक्षेत्र विकासाची कामे जून २०१९ अखेर पूर्ण करण्याचे उद्दिष्ट निर्धारित करण्यात आले आहे.

निम्न वर्धा प्रकल्पास महाराष्ट्र शासनाच्या पाटबंधारे विभागाची शासन निर्णय क्र. पीआयएम, ८५७९/ १७७१/जा.अ.२, दि.९.१.१९८१ अन्वये रु ४८.०८.कोटी (वर्ष १९७९-८०) किंमतीस मूळ प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली आहे. निम्न वर्धा प्रकल्पाच्या तृतीय सुधारित अंदाजपत्रकास विदर्भ पाटबंधारे महामंडळाचे निर्णय क्र. विपाविम/कातां.२/६६१/ सुप्रमा/(१०/२००९)/ २००९, दि.१८.८.२००९ अन्वये रु. २३५६.५७ कोटी (दर सूची सन २००८-०९) किंमतीस सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त झालेली आहे. केंद्र शासनाच्या नियोजन आयोगाने त्यांचे पत्र क्र. २ (४०६)/२००७/डब्ल्यू आर दि. १८/०३/२०११ अन्वये प्रकल्पाच्या रु. २२३२.४१ कोटी (सन २००८-०९) किंमतीस मान्यता प्रदान केली आहे.

विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या नियामक मंडळाच्या दि.३१.१.२०१८ रोजी झालेल्या बैठकीत निम्न वर्धा प्रकल्पाचा रु.३६१५.२९ कोटी किंमतीचा चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यतेचा प्रस्ताव मा.मंत्रीमंडळासमोर सादर करण्याचा ठराव (क्र.६८/३) पारित करण्यात आला आहे. त्यानुषंगाने सदर प्रस्ताव मा.मंत्रीमंडळाच्या दि.१२ जुलै,२०१८ च्या बैठकीत विचारार्थ ठेवण्यात आला होता.

मा.मंत्रीमंडळाने बांधकामाची सद्य:स्थिती, किंमतवाढीची कारणमीमांसा यांचा सखोल परामर्श घेऊन निम्न वर्धा प्रकल्पाच्या जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभाग दरसूची २०१६-१७ वर आधारित रु. ३६१५.२९ कोटी किंमतीच्या चतुर्थ सुधारित प्रकल्प अहवालास प्रशासकीय मान्यता देण्याचा जाणीवपूर्वक निर्णय घेतला आहे.

**शासन निर्णय -:**

निम्न वर्धा प्रकल्पाच्या (जलसंपदा विभाग व सार्वजनिक बांधकाम विभागाच्या सन २०१६-१७ च्या दरसूचीवर आधारित ) रु.३६१५.२९ कोटी या किंमतीस (प्रत्यक्ष कामासाठी एकूण रु.३३८९.११ कोटी व अनुषंगिक खर्च रु.२२६.१८ कोटी ) खालील अटींच्या अधीन राहून चतुर्थ सुधारित प्रशासकीय मान्यता प्रदान करण्यात येत आहे. प्रकल्पाच्या उपशिर्षनिहाय तरतुदींचा गोषवारा परिशिष्ट-अ मध्ये सोबत जोडला आहे.

१. राज्यस्तरीय तांत्रिक सल्लागार समितीच्या छाननी अहवालातील परिच्छेद क्र.२६ व २७ अंतर्गत नमूद सर्व मुद्दयांचे अनुपालन करावे.
२. उपलब्ध निधीचे Thin Spreading टाळणेचे दृष्टीने प्रकल्प घटकांच्या बांधकामावरील गुंतवणुकीचा प्राधान्य क्रम निश्चित करून त्यानुसारच कामे करावीत.
३. उच्च न्यायालयातील प्रलंबित जनहित याचिका , तसेच विशेष चौकशी समितीच्या अनुषंगाने चालू किंवा प्रस्तावित चौकश्या व त्यानुंषगाने करावयाच्या कार्यवाहीवर या सुधारित प्रशासकीय मान्यतेच्या निर्णयामुळे कोणतीही बाधा पोहचणार नाही.
४. प्रकल्प कार्यान्वित करण्यात काही अनियमितता निदर्शनास आल्यास त्याची जबाबदारी संबंधित क्षेत्रिय अधिका-यांवर राहील.
५. पूर्ण झालेल्या घटक कामाचे घटक निहाय समाप्ती अहवाल तयार करुन सदर कामे तात्काळ सिंचन व्यवस्थापन यंत्रणेकडे हस्तांतरीत करावीत.
६. प्राथमिक अवस्थेतील घटक कामावर खर्च करु नये.
७. निम्न वर्धा प्रकल्पांतर्गत असलेल्या सर्व उपसा सिंचन योजनांतर्गतच्या पंपाच्या परिचालनासाठी होणारा आवर्ती खर्च कमी करण्याच्या दृष्टीने तसेच योजनेच्या शाश्वत स्वरुपातील परिचालनासाठी सौर उर्जेचा जास्तीत जास्त वापर करावा. याकरिता केंद्र शासनाच्या उर्जा

मंत्रालयांतर्गत असलेल्या EESL(Energy Efficiency Service Limited ) या सार्वजनिक उपक्रमाचे तसेच राज्य शासनाच्या अधिपत्याखालील महाउर्जा (MEDA-Maharashtra Energy Development Agency) यांचे सहकार्य घेण्यात यावे. सौर उर्जा वापराच्या अनुषंगाने काही यंत्रणा उभारणी करणे आवश्यक असल्यास त्याकरिता येणा-या खर्चाची तरतूद प्रकल्पाच्या पुढील सुधारित प्रकल्प अहवालात करुन त्यास प्रचलित कार्यपध्दतीनुसार विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळाच्या नियामक मंडळाकडून सुधारित प्रशासकीय मान्यता प्राप्त करुन घ्यावी. याकरिता मंत्रीमंडळासमोर प्रस्ताव सादर करण्याची आवश्यकता नाही.

८. प्रकल्पावर ज्या ठिकाणी वितरीका /लघुकालवे यांची कामे हाती घेतलेली नाहीत, अशा ठिकाणी बंद नलिकेद्वारे सिंचन करण्याचा पर्याय वापरावा.

या प्रकल्पाच्या कामावरील खर्च मागणी क्र. आय-५, मुख्य लेखाशीर्ष ४७०१ मोठे व मध्यम पाटबंधाऱ्यावरील भांडवली खर्च,(१९०) सार्वजनिक क्षेत्रातील व इतर उपक्रमांना कर्जे (०२)(०२) विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळास भाग भांडवली अंशदान (कार्यक्रम )(४७०१ एच६६५) ५४, गुंतवणुका या खाली खर्ची घालावा व शासनाच्या मंजूर अनुदानातून भागविण्यात यावा.

सदर शासन निर्णय नियोजन विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.८५/२०१८ दि. २२.५.२०१८ व वित्त विभागाच्या अनौपचारीक संदर्भ क्र.व्यय-१२, दि.२९.५.२०१८ अन्वये सहमती दिल्यानुसार निर्गमित करण्यात येत आहे.

या योजनेस प्रदान करण्यात आलेल्या सुधारित प्रशासकीय मान्यतेची नोंद मोठे प्रकल्प-२ कार्यासनाच्या प्रशासकीय मान्यता नोंदवहीमध्ये सन २०१८-१९ अ.क्र.३ वर घेण्यात आली आहे.

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेतांक २०१८०८२३१६४३२५२१२७ असा आहे.हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करून काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Pandurang Tulshiram Kedare

Digitally signed by Pandurang Tulshiram Kedare
DN: c=IN, o=Government Of Maharashtra, ou=Water Resources Department, postalCode=400032, st=Maharashtra, 2.5.4.20=e594e26c6ca4bffd8b1d4e20a155e473c21b0dd40f25c25bd478079005896501, cn=Pandurang Tulshiram Kedare
Date: 2018.08.23 16:45:26 +05'30'

**(पां. तु. केदारे)**
अवर सचिव,महाराष्ट्र शासन

सहपत्र : परिशिष्ट -अ

**प्रत,**

१) मा. राज्यपाल, महाराष्ट्र राज्य, मुंबई.
२) मा. मुख्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.
३) सर्व मा. मंत्री/ मा. राज्यमंत्री, महाराष्ट्र राज्य, मंत्रालय, मुंबई.

४) मा.विरोधी पक्ष नेते,विधानसभा / विधानपरिषद/ विधानमंडळ, महाराष्ट्र राज्य,मंत्रालय,मुंबई
५) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा व अनुज्ञेयता), मुंबई/नागपूर.
६) महालेखापाल, महाराष्ट्र राज्य (लेखा परिक्षा), मुंबई/नागपूर.
७) वित्त विभाग (व्यय-१२), मंत्रालय, मंबई-३२.
८) नियोजन विभाग (कार्यासन १४३४), मंत्रालय, मंबई-३२.
९) कार्यकारी संचालक, विदर्भ पाटबंधारे विकास महामंडळ, नागपूर.
१०) महासंचालक, संकल्पचित्र, प्रशिक्षण, जलविज्ञान, संशोधन व धरण सुरक्षा, नाशिक
११) मुख्य अभियंता ,जलसंपदा विभाग, अमरावती.
१२) आंतर वित्त सल्लागार व उप सचिव, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मुंबई-३२.
१३) अधिक्षक अभियंता, बुलढाणा पाटबंधारे मंडळ, बुलढाणा.
१४) जिल्हाधिकारी, बुलढाणा.
१५) उप सचिव (निवसं), जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१६) अर्थ शाखा १ व २, जलसंपदा विभाग, मंत्रालय, मंबई-३२.
१७) कार्यासन मोप्र-२ संग्रहार्थ.

**परिशिष्ट-अ**

**निम्न वर्धा प्रकल्प**

**ता. आर्वी जि. वर्धा**

**उपशीर्षवार तरतुदींचा गोषवारा**

**किंमत रू कोटी**

| अ.क्र. | उपशीर्ष | रक्कम | | एकूण रक्कम |
|---|---|---|---|---|
| | | शीर्ष कामे | कालवा व वितरण प्रणाली | |
| १ | "अ" प्राथमिक | २.६५ | ८.६७ | ११.३२ |
| २ | "ब" भूसंपादन व पूनर्वसन | ६८२.३१ | ४३३.३६ | १११५.६६ |
| ३ | “सी” मुख्य कामे | | | |
| ३ | i) धरण | २२२.३४ | ०.०० | २२२.३४ |
| | ii) बॅरेज | ३४४.७४ | ०.०० | ३४४.७४ |
| | iii) उपसा सिंचन योजना | २६३.४२ | ०.०० | २६३.४२ |
| ४ | "डी" विमोचक | ९.१४ | ७.११ | १६.२४ |
| ५ | "ई" प्रपात | ०.०० | १.११ | १.११ |
| ६ | "फ" आरएचटी कामे | ०.०० | ९९.११ | ९९.११ |
| ७ | "जी" पूल | ०.०० | ४१.६० | ४१.६० |
| ८ | "एच" अतिवाही | ०.०० | ९.६९ | ९.६९ |
| ९ | "के" इमारती | ४.०२ | ९.४६ | १३.४८ |
| १० | "एल" मातीकाम | ०.०० | १३६.३७ | १३६.३७ |
| | अस्तरीकरण | ०.०० | ३२२.९८ | ३२२.९८ |
| ११ | "एम" वृक्षारोपन | १.६४ | १.८८ | ३.५२ |
| १२ | "ओ" संकीर्ण | ९.५० | ९.२८ | १८.७८ |
| १३ | "पी" देखभाल | ७.१८ | २.४२ | ९.६० |
| १४ | "क्यू" विशेष हत्यारे व संयंत्रे | १.६७ | ०.०७ | १.७४ |
| १५ | "आर" दळणवळण | ५०.५६ | ०.०३ | ५०.५९ |
| १६ | "एक्स " पर्यावरण | ३.५९ | ०.०० | ३.५९ |
| १७ | III वितरिका उपकालवे | ०.०० | ५४८.३१ | ५४८.३१ |
| १८ | भाग-१ लाक्षेवि कामे | ०.०० | १५४.९१ | १५४.९१ |
| **कामाप्रित्यर्थ किंमत** | | **१६०२.७५** | **१७८६.३७** | **३३८९.११** |
| **अनुषंगिक खर्च** | | **(आस्थापना, हत्यारे व अवजारे)** | | **२२६.१८** |
| **प्रकल्पाची एकूण किंमत** | | | | **३६१५.२९** |